**शिवछत्रपती क्रीडा संकुल, महाळुंग, बालेवाडी, जि. पुणे येथील शुटींग रेंजच्या अद्यावतीकरणाकरीता नविन टार्गेट सिस्टिम ही एकल स्त्रोत निवडीचा वापर करुन थेट उत्पादक कंपीनकडून खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण- ३०१८/प्र.क्र.२५२/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २० नोव्हेंबर, २०१८.

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग केआयपी-२३१८/ प्र.क्र. १९७ / क्रीयुसे-१, दि. ६ ऑक्टोबर, २०१८.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि. १७/४/२०१५
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६.

प्रस्तावना -

खेलो इंडिया युथ गेम्स-२०१९ या राष्ट्रीय स्पर्धाचे आयोजन केंद्र व राज्य शासनाच्या संयुक्त विद्यमाने शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे, बालेवाडी, पुणे येथे दि. ९ जानेवारी ते २० जानेवारी, २०१९ या कालावधीत होणार आहे. या स्पर्धेमध्ये १० मी. शुटींग हा क्रीडा प्रकार होणार असल्याने, खेलो इंडिया युथ गेम्स करीता केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या Game Technical Conduct Committee (GTCC) सदस्यांनी व राष्ट्रीय शुटींग फेडरेशनचे प्रतिनिधी यांनी १० मी, २५ मी. व ५० मी. शुटींग रेंज येथे प्रत्यक्ष भेट देऊन पाहणी केली. व त्यांनी सूचित केल्यानुसार, सद्यस्थितीत, अस्तित्वात असलेले शुटींग रेंज हे सन २००८ मध्ये तयार करण्यात आले होते. ते स्पर्धा भरविण्यासाठी योग्य नसून, तेथील १० मी. शुटींग रेंज व फायनल शुटींग रेंज येथील सद्य परिस्थितीत खराब झालेले टार्गेट बदलून अद्ययावत LS-१० मॉडेलचे टार्गेटस बसविण्याच्या सूचना केल्या आहेत. नॅशनल रायफल असोसिएशन ऑफ इंडिया यांनी त्यांच्या दिनांक ४/९/२०१८ च्या पत्रान्वये, स्वीस एस्कॉर, स्वित्झर्लंड यांचे मॉडेल LS १० यास इंटरनॅशलन शुटींग स्पोर्ट फेडरेशन (ISSF) यांनी मान्यता दिले असल्याचे कळविले आहे.

आगामी होणाऱ्या खेलो इंडिया युथ गेम्स, २०१९ करीता शिवछत्रपती क्रीडा संकुल, महाळुंग, बालेवाडी येथील शुटींग रेंजचे अद्ययावती करणे आवश्यक असून, याकरीता एकूण रुपये ७,३६,७५,८२२/- इतका खर्च अपेक्षित आहे. सदर अद्यावतीकरणाकरीता नविन टार्गेट सिस्टिम एकल स्त्रोत खरेदी पद्धतीने स्विस एस्कॉर, स्वित्झर्लंड या उत्पादक कंपनीकडून खरेदी करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**-

खेलो इंडिया युथ गेम्स-२०१९ स्पर्धाचे आयोजन केंद्र व राज्य शासनाच्या संयुक्त विद्यमाने शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे, बालेवाडी, पुणे येथे दि. ९ जानेवारी ते २० जानेवारी, २०१९ या कालावधीत होणार आहेत. या स्पर्धेमध्ये शुटींग क्रीडा प्रकारासाठी शुटींग रेंजचा वापर करण्यात येणार असून, त्याकरीता शुटींग रेंजमधील खराब झालेले टारगेट बदलून रेंजचे अद्ययावतीकरण करुन, तेथील १० मी. शुटींग रेंज व फायनल शुटींग रेंज येथे LS-१० मॉडेलचे ८० टार्गेटस बसविण्याच्या व वॉरंटीनंतर त्यापुढील वर्षाचा वार्षिक देखभाल दुरुस्ती करारापोटी येणारा खर्च भागविण्यासाठी रु. ७,३६,७५,८२२/- (रुपये सात कोटी छत्तीस लक्ष पंच्याहत्तर हजार आठशे बावीस फक्त ) इतक्या किंमतीचे नविन टार्गेट सिस्टिम "स्विस एस्कॉर, स्वित्झर्लंड" या उत्पादक कंपनीकडून एकल स्त्रोत खरेदी पद्धतीने खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता खालील अटीच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

१) शिवछत्रपती क्रीडा संकुल येथील शुटींग रेंजचे अद्ययावतीकरण करण्याकरीता खेलो इंडीया अंतर्गत अनुदान मिळणेबाबतचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आला आहे. सदर कामासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीमधून सदर खर्च भागविण्यात यावा.
२) एकल स्त्रोत निवड पद्धतीनुसार प्राप्त "स्विस एस्कॉर, स्वित्झर्लंड" या कंपनीचा दर जादा नसल्याची खातरजमा त्यांनी यापूर्वी पुरवठा केलेल्या खरेदीदाराकडून करण्यात यावी.

सदरहू शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२ /भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील परिच्छेद ३.२.६ मध्ये नमूद तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२०१४२३०४४८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.11.20 16:01:49 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२. मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
३. मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. आयुक्त/संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व उपसांचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा, संचालनालयामार्फत).
१३. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा, संचालनालयामार्फत).
१४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१६. मा.राज्यमंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१, क्रीयुसे-२ व क्रीयुसे-३).